संरक्षित वनांचे क्षेत्रालगतच्या गावातील सर्वसाधारण जातीच्या लाभार्थ्यांना कुकींग गॅस, बायो गॅस, दुभत्या जनावरांसाठी अनुदान व वृक्ष लागवडीच्या संरक्षणासाठी प्रोत्साहन देण्याकरिता अनुदानाचे वाटप. सन २०१६-१७.

महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग,

शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१६/प्र.क्र.२०८/फ-२

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ३१ मार्च, २०१७

वाचा : १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/इए/यो/नबाप्र/प्र.क्र.०१/१६-१७/६१, दि.१३.०४.२०१६.

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१६/प्र.क्र.२०८/फ-२, दि.२१.०४.१६

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.०८.०२.२०१७.

**प्रस्तावना :-**

सन २०१६-१७ करिता “ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१)” या लेखाशिर्षांतर्गत एकूण रु.२२६५.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत करण्यात आलेला होता. त्याचप्रमाणे विधानमंडळाच्या सन २०१६ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये रु.२५१७.८७ लक्ष आणि डिसेंबर, २०१६ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये रु.१०९७.०० लक्ष इतका अतिरिक्त निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला असून सदर लेखाशीर्षाखाली एकूण रु.५८८०.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पीत तरतूद झालेली आहे.

२. सदरहू योजनेंतर्गत मुळ अर्थसंकल्पित असलेल्या निधीच्या अनुषंगाने सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता संरक्षित वनाचे लगत क्षेत्रातील गावाचे सर्वसाधारण जातीच्या लाभार्थ्यांना (अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीचे लाभार्थी वगळून) कुकींग गॅस / बायो गॅस पुरवठा करण्याकरिता ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशिर्षांतर्गत रु.१०९८.४० लक्ष रक्कमेचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य नागपूर यांनी संदर्भ क्र.२ वरील दि.१३.०४.२०१६ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने अर्थसंकल्पीत निधीच्या ८० % मर्यादेत रु.८७८.७३ लक्ष इतका निधी संदर्भ क्र.३ येथील दि.२१.०४.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला आहे.

३. सन २०१६-१७ चा सुधारीत अंदाज वित्त विभागामार्फत निर्गमित करण्यात आलेला आहे. सदर सुधारीत अंदाजानुसार (Revise Estimate) २४०६१५२१ या संकेतांकामध्ये रु.५०१७.३७ लक्ष इतका निधी वितरणाकरिता उपलब्ध असून त्यापैकी रु.५००१.५२ लक्ष इतका निधी या विभागाच्या विविध शासन निर्णयांन्वये वितरीत करण्यात आलेला आहे. त्यामुळे सदर लेखाशीर्षांतर्गत आता रु.१५.८५ लक्ष इतका निधी वितरणाकरिता शिल्लक राहत असून सदरचा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय</u> :-

४. वित्त विभागाच्या दि.०८.०२.२०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१६-१७ या वर्षामध्ये योजनांतर्गत योजनांकरिता अर्थसंकल्पित निधीच्या ८० % मर्यादेत निधी वितरणास मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच वित्त विभागामार्फत सन २०१७-१८ जे अर्थसंकल्पीय अंदाजपत्रक निर्गमित करण्यात आले असून सदर अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये (White Book) सन २०१६-१७ चा सुधारीत अंदाज दर्शविण्यात आलेला आहे. त्यानुसार, २४०६१५२१ या संकेतांकामध्ये शिल्लक असलेला **रु.१५.८५ लक्ष (५० इतर खर्च)** इतका निधी संरक्षित वनाचे लगत क्षेत्रातील गावाचे सर्वसाधारण जातीच्या लाभार्थ्यांना कुकींग गॅस / बायो गॅस पुरवठा करण्याकरिता अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२ वरील दि.१३.०४.२०१६ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने वितरीत व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वरील अनुदान खर्च संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयातील अटी व शर्ती यांची पूर्तता होईल याची दक्षता घ्यावी.

६. उपरोक्त खर्च मागणी क्र.सी-७, प्रधानशीर्ष - २४०६, वनीकरण व वन्य जीवन, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना योजना, (११) (१०) ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६१५२१) या लेखाशीर्षाअंतर्गत (५०- इतर खर्च) सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ व २ येथील अनुक्रमे दि.२०.०४.२०१६ व दि.१२.०८.२०१६ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११९११३६४८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.04.10 14:45:01 +05'30'

**(डी.एल.थोरात)**

सह सचिव, महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) / (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक,

५) सर्व मुख्य वनसंक्षक (प्रादेशिक) / (वन्यजीव)

६) सर्व वनसंरक्षक / सर्व उप वनसंरक्षक (मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव) यांचेमार्फत)

७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर

८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

९) वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन मंत्रालय, मुंबई.

१०) नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.

११) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

१२) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

१३) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२